# एक खास ईद

अस्मा मोबिनुद्दीन

चित्रे व सजावट : लॉरा जेकब्सन

अनुवाद : सुजाता गोडबोले



# एक खास ईद

अस्मा मोबिनुद्दीन

चित्रे व सजावट : लॉरा जेकब्सन

अनुवाद : सुजाता गोडबोले



अनीसा आपल्या पलंगावर बसून खिडकीबाहेर पाहत होती. तिचे आई-वडील हाज यात्रेला गेले होते आणि तिला त्यांची आठवण येत होती. अमेरिकेतील तिच्या घरापासून सौदी अरबस्तान किती दूर होते.

तिला गेल्या वर्षीच्या ईदच्या सुटीची आठवण आली. तिने तेव्हा नवीन सलवार खमीज घातले होते, हातावर मेंदीने सुंदर लाल फुले काढली होती आणि अब्बा तर म्हणाले होते की ती अगदी राजकन्येसारखी दिसत होती.

अम्मीने तिला नाश्त्याच्या आधीच मिठाई खाऊ दिली होती. ते तिघे मिळून ईदच्या प्रार्थनेसाठी गेले होते आणि नंतरचा सर्व  दिवस मित्रमंडळींना भेटण्यात गेला होता. पण आज घरात शांतता होती.

तेवढ्यात तिची आजी लगबगीने खोलीत आली.

“ईद मुबारक, अनीसा! नानी येऊन  तिच्या पलंगावर बसली आणि तिला प्रेमाने जवळ घेऊन तिची एक पपी घेतली. “प्रार्थनेसाठी जायला लवकर तयार हो.” अनिसाने तिला एक पपी दिली आणि परत पलंगावर पडली.

“हे काय! आज एक मुलगी हसत का नाही?” नानीने हळूच तिच्या डोळ्यावर आलेले केस बाजूला केले. “अम्मी आणि अब्बाची आठवण येते आहे ना?”

अनिसाने हळूच मान डोलावली. तिला आता रडूच येणार होते.

“मला माहित आहे, तुला अम्मी आणि अब्बाशिवाय रहायची सवय नाही,” नानी म्हणाली.

“पण आता, निदान आज तरी अशी दुःखी होऊन बसू नकोस. आज तू आणि मी, आपण दोघीच खूप मजा करूया, काय?”

अनिसाने हळूच हसायचा प्रयत्न केला. तिला नानीला दुखवायचं नव्हतं. “हो, चालेल!” ती म्हणाली, तोपर्यंत नानी उठून कपाटाकडे गेली होती.

“आता तुझ्यासाठी माझ्याकडे एक सरप्राईज आहे.” नानीने कपाटातल्या चादरी खालून तिथे लपवलेला रंगीत कागदात गुंडाळलेला एक डबा बाहेर काढला.

अनिसाने डब्याला बांधलेली फित सोडली आणि डबा उघडला. पाकिस्तानातून आलेले ईदसाठीचे सुंदर नवे कपडे पाहून तिचे डोळे चमकू लागले. डब्यात सर्वात वर असलेला कुर्ता बाहेर काढून तिने सोनेरी भरतकाम केलेल्या आणि चमकणारे मणी  लावलेल्या मुलायम कापडावर हात फिरवला. नानीने त्याबरोबर असलेल्या जांभळ्या आणि सोनेरी बांगड्या उघडल्या त्यांचा मधुर आवाज तिच्या कानात घुमला. हाताने बनवलेल्या सुंदर पाकिस्तानी मोजडी अजून त्या डब्यातच होत्या.

“नानी, मला माझे ईदचे नवे कपडे खूप आवडले! जांभळा माझा आवडता रंग आहे हे तुला कसं समजलं?” अनिसाने आपल्या आजीला मिठी मारली. “आता मी हे कपडे कधी घालते असं झालं आहे.”

“आणखी देखील कपडे आहेत,” आजी हसत हसत म्हणाली आणि तिने एक लाल रंगाची सलवार कमीज  आणि पिवळ्या रंगाचा रेशमी घरारा बाहेर काढला. सर्व कपड्यांच्या बरोबर त्याच रंगाच्या बांगड्या आणि चपलाही होत्या.

‘ईदच्या तीन दिवसांसाठी तीन वेगवेगळे नवे कपडे आहेत. तुला ईदच्या प्रार्थनेला जाताना आज काय घालायचं आहे?”

“जांभळे कपडे!”

आजी हसली. “ते तुला छान शोभून दिसतील. तू तयार होईपर्यंत मी त्याला इस्त्री करून ठेवते. पण त्याआधी मला मटण कुर्मा एकदा ढवळायला हवा.”

"मटण कुर्मा!" अनिसाने पलंगावरून आनंदाने उडी मारली आणि ती स्वयंपाक घराकडे पळाली. तिच्या आवडीच्या पदार्थांचा खमंग वास दरवळत होता त्याने तर तिच्या तोंडाला पाणीच सुटले. "प्लिज, मला जरा चव बघण्यासाठी देतेस का?" आजीने एक चमचाभर कुर्मा बाहेर काढला, त्यावर फुंकर मारून तो गार केला आणि अनिसाला दिला. त्याची मसालेदार चव अनिसाला फारच आवडली, " वा! मस्तच आहे."

"तुला आवडला ना? आता आटप लवकर, नाहीतर आपल्याला प्रार्थनेला जायला उशीर होईल."



मशिदीत इमाम साहेबांनी हाजच्या यात्रेबद्दल प्रवचन दिले. ते ऐकून अनिसाला आपल्या आई-वडिलांची आणखीच आठवण येऊ लागली आणि तिचे प्रवचनाकडे लक्षच लागेना.

प्रवचन संपल्यावर महिला आणि मुलांनी आपले नमाजचे  गालिचे उचलून त्यांची घडी केली आणि एकमेकांना ईदच्या शुभेच्छा दिल्या. अनिसाच्या ओळखीचे खूप लोक होते, त्या सर्वांना तिने ईदच्या शुभेच्छा दिल्या.

मागच्या बाजूला टेबलावर ठेवलेले खाण्याचे पदार्थ लगेच संपले!

आजूबाजूला चाललेला आनंदसोहळा दोन मुली एका बाजूला उभ्या राहून मुकाट्याने पाहत होत्या तिकडे अनिसाचे लक्ष गेले. त्यातल्या मोठ्या मुलीचा हिजाब फाटलेला होता. छोट्या मुलीचे कपडे इतके ढगळ होते की ते खाली पडू नयेत म्हणून तिने ते आपल्या हाताने धरून ठेवले होते.

अनीसा त्यांच्याकडे गेली. “आज तुम्ही ईदला नवे कपडे का नाही घातले?” तिने विचारले.

त्यातली मोठी मुलगी लाजून खाली पाहू लागली.

आपली मोठी बहीण काही उत्तर देत नाही हे पाहून धाकटी म्हणाली, “आमच्याकडे ईदसाठी नवे कपडे नाहीत. आमच्या घराला आग लागली तेव्हा आम्हाला सर्व काही सोडून पळून यावे लागले.”

मग मोठी बहीण धाकटीला म्हणाली, “मरियम, आता इथे तरी युद्ध नाही याबद्दल आपण आभारी असायला हवे. आपण आता सुरक्षित आहोत आणि शिवाय एकत्र आहोत. अब्बा म्हणतात की आपल्या गरजेपुरेसे अल्ला आपल्याला देईल.”

“अब्बा आता आपल्याबरोबर असते तर किती बरे झाले असते ना! पण अमेरिकेत आल्यापासून त्यांना सारखेच काम करावे लागते,” मरियमने अनिसाला सांगितले. “त्यांना ईदच्या दिवशी देखील कामाला जावे लागले. पण नंतर ते झेनबसाठी आणि माझ्यासाठी मिठाई आणणार आहेत आणि दुपारच्या प्रार्थनेसाठी आम्ही सगळे एकत्र मशिदीत जाणार आहोत.”

अनीसा काही म्हणण्याआधीच सेल्मा आंटीने तिला जवळ घेतले आणि म्हणाली, “अनीसा बेटी, ईद मुबारक! माशा अल्ला! तू आज किती छान दिसते आहेस! आज तू आणि तुझी नानी नंतर माझ्याकडे या बरं  का!”

त्यानंतर बऱ्याच आंटींनी  तिला ईदच्या शुभेच्छा दिल्या आणि तिला जवळ घेऊन तिचे लाड केले. बराक आंटींनी  तिला मिठीत घेतले असताना अनिसाने पाहिले की मरियमने जमिनीवर पडलेला डोनटचा एक तुकडा उचलून घेतला आणि आपल्याकडे कोणी पाहत नाही ना असे बघून तो चटकन आपल्या तोंडात टाकला आणि बोटांना लागलेली साखर चाटून टाकली.



सगळे लोक मशिदीतून बाहेर पडू लागले तरी अनीसा  त्या मुलींकडेच पाहत होती. अखेर तिने नानीचा हात सोडला आणि त्या मुलींकडे परत गेली. काय म्हणावं ते तिला सुचत नव्हतं, पण त्यांच्याशी बोलल्याशिवाय तिला जायचं नव्हतं.

ती हळूच त्यांना म्हणाली, “आपण कधीतरी खेळायला भेटू या का?”

लगेच मरियमचा चेहरा खुलला. “हो, नक्की.” ती आनंदून म्हणाली. झेनब मात्र अजून खालीच पाहत होती.

“पण ... आता तुम्ही कुठे राहता?”

“मशिदी जवळच्या घरात.” मरियमने उत्तर दिले.

झेनबने मान वर करून अनिसाकडे पहिले आणि ती हळूच हसून म्हणाली, “६३ क्रमांकाच्या घरात.”

मग आपल्या बरोबर असलेल्या तीन मुलांना घेऊन जाणाऱ्या बाई मरियम आणि झेनबला घेऊन मशिदी बाहेर पडल्या.

दुपारी घरी आल्यावर आजी जेवण गरम करत असताना अनिसाने तिला भेटलेल्या दोन मुलींबद्दल सांगितले.

नानीने सर्व शांतपणे ऐकून घेतले. “काही वेळा लोकांना युद्धामुळे किंवा तशाच काही वाईट घटनांमुळे घर सोडून जावे लागले, तर त्यांना काहीच बरोबर नेता येत नाही, सर्व काही सोडून जावे लागते. अनेक कुटुंबे सुरक्षित जागी चांगले राहता यावे, आणि मुलाबाळांना चांगले शिक्षण मिळावे म्हणून अमेरिकेत आश्रय घेऊन राहिली आहेत.” आजीने तिला समजावून सांगितले.

“अल्ला अशा लोकांना मदत करतो का?”

“हो तर! अल्ला सगळ्यांनाच मदत करतो,” आजीने रस्सा गरम करता करता उत्तर दिले. “पण काही वेळा तो आपल्याला हव्या त्याच प्रकाराने मदत करत नाही. वाईट दिवस एकदम नाहीसे करण्याऐवजी तो कधी कधी चांगल्या लोकांना मदत करायला पाठवतो. पण लोकांना स्वतः देखील खूप कष्ट करावे लागतात आणि अल्लाची मदत मिळणार आहे यावर विश्वास ठेवावा लागतो.”

नानी आता रोटी बनवत होती. “तुला प्रेषित अब्राहम, त्याची बायको हजर आणि छोटा इस्माईल यांची गोष्ट आठवते का?”

अनिसाने मान डोलावली. तिच्या अम्मी आणि अब्बूने तिला सांगितले होते की हाज यात्रेच्या निमित्ताने मिळणारे बरेचसे धडे या गोष्टीवरच आधारित होते. अब्राहमच्या घरातील सर्वांचा अल्लावर आणि परिस्थिती कितीही कठीण असली तरी तो त्यातून मार्ग दाखवेलच यावर पूर्ण विश्वास होता.

अनीसा आणि तिच्या नानीने झेनब, मरियम आणि त्यांच्या कुटुंबासाठी प्रार्थना केली. अनिसाने तिच्या मनातला विचार मग नानीला सांगितला.

त्या दिवशी दुपारी, जशा सावल्या लांब होऊ लागल्या, तशी मुसलमान कुटुंबे असरची प्रार्थना संपवून मशिदीतून बाहेर पडू लागली.

“अनीसा शांतपणे बसून रहा. कोणालातरी तुझा आवाज येईल,” नानीने आपल्या नातीच्या कानात हळूच सांगितले. आता त्या दोघी मशिदी शेजारच्या इमारतीच्या बाहेरच्या झाडांमागे लपून बसल्या होत्या. “आता ते इकडेच येत आहेत. खाली वाकून बस!”

दोन मुली आणि एक माणूस त्यांच्या दारासमोरच्या फुटक्या पायरीवर सजवलेल्या टोपल्या ठेवल्या होत्या त्याकडे पाहत असलेले त्यांना पानांमधून दिसत होते. “अरे, हे काय आहे?” आश्चर्यचकित होऊन त्या माणसाने टोपलीवरची चिठ्ठी वाचली. “मरियम, झेनब आणि त्यांच्या वडिलांना ईदच्या शुभेच्छा.”

अनिसाला तिचे आश्चर्य आणि आनंद लपवता येत नव्हता. त्यांना यातल्या भेटवस्तू आवडतील का? झेनब आणि मरियमने टोपल्या उघडल्या.

“वा! किती सुंदर कपडे आहेत! या पिवळ्या कुडत्यावर बघ किती चमचम लावली आहे!”

“हे लाल कपडे पण किती सुरेख आहेत- आणि त्याच्याबरोबर मॅचिंग बांगड्या आणि चपला सुद्धा आहेत!”

“माझा तर विश्वासच बसत नाही,” तो माणूस हळूच म्हणाला. “मटण आणि चिकन, तांदूळ आणि भाज्या. शिवाय मिठाई सुद्धा. कुणी बरं हे इथे पाठवलं असेल?”

“आब्बा, आम्हाला या टोपल्या आत न्यायला जरा मदत करता का?” मरियम एक टोपली ढकलण्याचा प्रयत्न करत होती.

“मुलींनो, ती टोपली खाली ठेवा, आपण असे फुकटचे काही घेत नाही.” अब्बा रागावून म्हणाले.



त्यांचे वडील जरा थबकले तेव्हा मरियमने हळूच विचारले, “पण मी फक्त हे पिवळे कपडे घेऊ का? मला पिवळा रंग खूप आवडतो. आणि या चमकणाऱ्या बांगड्या?

“नाही, बाळांनो,” अब्बा परत म्हणाले, “तुम्हाला माहित आहे ना, खरा मुसलमान कोणाकडेही भीक मागत नाही.”

“पण अब्बा, आम्ही कुणाकडे काहीच मागितले नव्हते.” झेनब म्हणाली.

पण त्याचा वडिलांवर काही परिणाम झाला नाही. “माझ्या कुटुंबाला जे लागेल, ते सगळे मी मिळवेन. आपल्यापेक्षा देखील या सामानाची आणि कपड्यांची गरज असणारे अनेक लोक आहेत. चला, आता आपण जाऊया.”

“मी या मिठाईचा फक्त एक तुकडा घेऊ का?”

अनिसाच्या छातीत धडधडू लागले. त्यांनी जर या भेटवस्तू घेतल्याच नाहीत तर? नीट पाहण्यासाठी ती थोडी पुढे वाकली, तेवढ्यात एक लहानशी फांदी तुटली.

“हा कसला आवाज झाला?” झाडांकडे पाहण्यासाठी वळताना अब्बा म्हणाले. अनीसा आणि नानी त्यांच्याकडे येणाऱ्या पावलांचा आवाज ऐकून परत लपून बसल्या.





मरियमच्या वडिलांचा काहीसा कठोर चेहरा आणि निश्चयी हनुवटी आता अनिसाला पानांच्या मधून दिसत होती. त्यांच्या भुवया जरी जाड असल्या तरी त्यामागचे डोळे मात्र शांत, प्रेमळ होते. तिच्या वडिलांच्या डोळ्यांत  जशी ममता दिसायची तोच भाव तिला त्यांच्याही डोळ्यात दिसला.

अनीसा आणि ते गृहस्थ एकमेकांकडे बराच वेळ पाहत होते. मग ते अचानक वळले आणि आपल्या मुलींकडे गेले.

ते एक गुडघा टेकून खाली बसले आणि आपले हात पुढे केले. मुलींनी त्यांना मिठी मारली आणि मरियम त्यांच्या गुडघ्यावर चढली. आपली नाजूक बोटे त्यांच्या गालावर फिरवत ती म्हणाली, “अब्बा, आपल्याला लागते त्यापेक्षा किती तरी अधिक अन्नधान्य इथे आहे. आपण त्यातले काही आपल्या शेजाऱ्यांना देऊया का?”

“पण प्लिज, आपण हे ईदसाठीचे नवे कपडे ठेवून घेऊया का?” झेनबने विचारले.

आपल्या दोन्ही मुलींना जवळ घेतांना त्यांचा चेहरा आणखीच प्रेमळ दिसू लागला. त्यांना जवळ घेता घेता त्यांनी होकारार्थी मान डोलवली. आणि अनीसा आणि नानीकडे पाहत त्यांनी एक स्मित केले.

अनीसा आणि नानी घरी आल्यावर नानीने फोन उचलला आणि नंबर फिरवला. “मला एक मध्यम आकाराचा शाकाहारी पिझ्झा पाठवाल का?” फोन खाली ठेवल्यावर तिने मान हलवली. “आज ईद आहे आणि आपण पिझ्झा खाणार आहोत! मी ईद अशी कधीच साजरी केली नव्हती.”

“मी पण!” अनीसा म्हणाली. “मी अम्मी  आणि अब्बाना कधी एकदा हे सगळं सांगते असं मला झालं आहे!”

मग संध्याकाळी थोड्या वेळाने जेव्हा नानी आणि अनीसा  आरामात बसून पिझ्झा खात होत्या, तेव्हा ही  लक्षात राहण्यासारखी सगळ्यात छान ईद होती यावर त्या  दोघींचे  एकमत झाले.

समाप्त

# टीपा

## हाज यात्रा

इस्लाम धर्मियांची हाजची यात्रा ही दरवर्षी भरणारी जगातील सर्वात मोठ्या यात्रांपैकी एक आहे. यात्रेकरू आता सौदी अरबस्थानात असलेल्या मक्का येथे व त्या परिसरातील अनेक ठिकाणांना भेट देऊन, परमेश्वराची प्रार्थना करून त्याच्याकडे कृपेची याचना करतात. शारीरिकदृष्ट्या आणि आर्थिकदृष्ट्या शक्य असेल असे सर्व लोक निदान एकदा तरी ही यात्रा करतात. या यात्रेतील अनेक प्रथांचा संबंध प्रेषित अब्राहम आणि त्याच्या कुटुंबातील व्यक्तींच्या अनुभवांशी निगडित आहे.

## ईद अल-अधा

मुसलमानांचे दोन महत्वाचे सण असतात. ईद अल- फित्र हा सण रमझानच्या महिन्यांनंतर येतो. या गोष्टीतील ईद अल-अधा हाजच्या यात्रेनंतर साजरी केली जाते. परमेश्वराच्या इच्छेचे पालन करण्यासाठी आपल्या एकुलत्या एक मुलाचा बळी देण्याची देखील त्याची तयारी होती, म्हणून प्रेषित अब्राहमच्या आज्ञाधारकपणाचा, दृढ निश्चयाचा आणि त्याच्या परमेश्वरावरील प्रेमाचा सन्मान करण्यासाठी हा सण साजरा करतात. परमेश्वराने घेतलेली ही मोठी कठीण परीक्षा अब्राहमने पार केली असे स्पष्ट झाल्यावर त्याच्या मुलाऐवजी एका रेड्याचा बळी देण्यात आला. ही गोष्ट कुराण आणि बायबल या दोन्ही ग्रंथांमध्ये आहे, फरक केवळ काही तपशिलाचा आहे. लोकांनी आपल्या आयुष्यात इतर कशाहीपेक्षा परमेश्वरावर अधिक प्रेम करावे असाच या सणातून धडा देण्यात आला आहे.

## अब्राहम, हजर आणि इस्माईल

ही नावे अरबी भाषेत इब्राहिम, हाजर आणि इस्माईल अशी उच्चारली जातात. मुसलमानांची अशी समजूत आहे की आपली दुसरी पत्नी हाजर व तान्हा मुलगा यांना वाळवंटात सोडून द्यावे अशा अर्थाचे अब्राहमला एक स्वप्न पडले. आपल्याकडील अन्नधान्य संपल्यावर वाळवंटात एकटी असलेली हाजर भुकेने व तहानेने रडणाऱ्या आपल्या तान्ह्या बाळाला घेऊन दोन टेकडयांच्या मधील भागात परमेश्वराची मदतीसाठी प्रार्थना करत पाण्याच्या शोधात पळू लागली. मग परमेश्वराने त्या बाळाच्या आणि आईच्या जवळच एक पाण्याचा झरा निर्माण केला.

परमेश्वरावर श्रद्धा ठेऊन आणि तो मदत करेलच अशा दृढ विश्वासाने साफा आणि मारवा या दोन टेकड्यांमध्ये हाजर प्रमाणे येरझाऱ्या करणे हा हाजच्या यात्रेतील एक महत्वाचा भाग आहे. हाजरच्या प्रार्थनेनंतर निर्माण झालेल्या झऱ्यातून म्हणजे आताच्या झमझम या विहिरीतील पाणी पवित्र मानून प्यायले जाते.

बायबल मधील २१ व्या प्रकरणात देखील हजर व इस्माइलसाठी परमेश्वराने वाळवंटात एक विहीर निर्माण केली असा उल्लेख आहे. बायबलमधील इतर तपशील मात्र इस्लाममधील प्रथेपेक्षा निराळे आहेत.